**श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठी विकास आराखडा,**
**निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०२०/प्र.क्र.४५/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २९ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

१.नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.६६/का.१४४४,दि.१३ नोव्हेंबर, २०१८
२.नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४,दि.६एप्रिल,२०२१.
३. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४, दि. ४ मे, २०२१.
४.नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४, दि. ३ जून, २०२१.
५.नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४,दि.१३जुलै, २०२१.
६. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४,दि.४ऑगस्ट, २०२१.
७. नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१८/प्र.क्र.४५/का.१४४४,दि.१सप्टेंबर, २०२१.
८. वित्त विभाग शासन निर्णय, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१

**प्रस्तावना :-**

श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या विकास आराखड्यास दिनांक १३ नोव्हेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये, रु.१४२७.८५ कोटी शासन सहभागातील कामांना मंजुरी देण्यात आली आहे. या आराखड्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात “०१-वेतन” या उद्दिष्टाकरिता अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी “विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे” यांना उपरोक्त संदर्भाकित क्र.२ ते ७ येथील शासन निर्णयान्वये खालीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

| अ.क्र. | शासन निर्णयाचा दिनांक | वितरीत करण्यात आलेला निधी ( रु.लाखात) |
|---|---|---|
| १ | ६.४.२०२१ | ४.०० |
| २ | ४.०५.२०२१ | २.०० |
| ३ | ३.०६.२०२१ | ४.०० |
| ४ | १३.०७.२०२१ | २.०० |
| ५. | ४.०८.२०२१ | २.८० |
| ६ | १.०९.२०२१ | ५.२० |
| **एकुण** | | **२०.००** |

आता “०१-वेतन” “०६ दूरध्वनी, वीज व पाणी बिल”, “११-देशांतर्गत प्रवास खर्च”, “१३-कार्यालयीन खर्च” या उदिष्टाखाली उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

" श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ मार्गावरील मूलभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच्या विकास आराखडा" अंतर्गत खालील बाबींसाठी विभागीय आयुक्त, पुणे यांना एकुण रु.५,१२,५००/- (रुपये पाच लाख बारा हजार पाचशे फक्त) निधी वितरित करण्यात येत आहे. या निधीचे उद्दिष्टनिहाय वाटप खालीलप्रमाणे आहे.:-

| **मुख्य लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **अर्थसंकल्पित निधी** | **यापूर्वी वितरित केलेला निधी** | **या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|
| **३४५२ २७११** | "०१-वेतन" | रु. ४०,००,००० | रु. २०,००,००० | **रु. ४,००,०००** |
| | "०६ दूरध्वनी, वीज व पाणी बिल " | रु. ५०,००० | ० | **रु. २०,०००** |
| | "११-देशांतर्गत प्रवास खर्च" | रु. ५०,००० | ०.०० | **रु. १२,५००** |
| | "१३-कार्यालयीन खर्च" | रु. २,००,००० | ०.०० | **रु. ८०,०००** |
| **एकुण** | | **रु. ४३,००,०००/-** | **रु. २०,००,०००/-** | **रु. ५,१२,५००** |

२. सदर खर्च लेखाशिर्ष "मागणी क्र.ओ-८, मुख्य लेखाशिर्ष ३४५२-पर्यटन, ०१-पर्यटनसाठी पायाभूत सुविधा, १०१-पर्यटन केंद्रे, (००) (०१) श्रीक्षेत्र देहू-आळंदी, भंडारा डोंगर, पंढरपूर व पालखीतळ क्षेत्र विकास विशेष कृती कार्यक्रम (३४५२ २७११) योजनातंर्गत (दत्तमत)" याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाचा ताळमेळ घालण्यात यावा. वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२८१५४८१४८०१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manjusha Amit Karande

Digitally signed by Manjusha Amit Karande
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b1c1c68b2fb7d60932c7a539658f299af288eb5fbe81ceb2178b5deea6f7a28, pseudonym=664B16A5DBAC004081D0464EC938A1DC9A699BBA, serialNumber=6BC8432DE7E7323854E5E7499C63951988287A093EF9B088F4B029753EA90109, cn=Manjusha Amit Karande
Date: 2021.09.29 17:58:42 +05'30'

**( मंजुषा कारंडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**आवश्यक कार्यवाहीसाठी,**

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे,

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,

२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर,

३. जिल्हाधिकारी, पुणे/सोलापूर,/सातारा/अहमदनगर,

४. विशेष कार्य अधिकारी, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे,

५. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

७. नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई,

८. निवड नस्ती, का. १४४४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

-----------------